**परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान व रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांना रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ति उपदान तसेच सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अंनियो-२०२३/प्र.क्र. २८/टिएनटी ६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १४ जून, २०२३.

<u>वाचा :</u>

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो १००५/प्र.क्र.१२६/सेवा- ४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनिया १००७/प्र.क्र.१८/सेवा-४, दिनांक ७ जुलै, २००७
३) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः अंनियो १००६/(२३/६)/माशि २, दि.२९/११/२०१०
४) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः एसएसएन २०१२/(१५४/१२)/माशि २, दि.५/२/२०१३
५) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१२/प्र.क्र.९६/सेवा-४, दि.२७.०८.२०१४
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंनियो २०१५/ (NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.०६.०४.२०१५
७) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. अंनियो ३४१५/प्र.क्र.२७६/टिएनटी ६, दि.१९/०९/२०१९
८) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. अंनियो २०१८/प्र.क्र.१४४/टीएनटी-६, दि.२०/०८/२०१९
९) केंद्र शासनाचे कार्यालयीन ज्ञापन क्र.३८/४१/०६/P&PWA), दि.०५.०५.२००९
१०) केंद्र शासनाचे कार्यालयीन ज्ञापन क्र.७/५/२०१२-P&PW(F)/B, दि.२६.०८.२०१६
११) केंद्र शासनाची अधिसूचना क्र.G.S.R.२२७ (E) दिनांक ३०.०३.२०२१.
१२) केंद्र शासनाची अधिसूचना क्र.G.S.R.६५८ (E), दिनांक २३.०९.२०२१
१३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः रानियो-२०२२/प्र.क्र.३४/सेवा ४, दि. ३१ मार्च, २०२३
१४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः रानियो-२०२२/प्र.क्र.३४/सेवा ४, दि. २० एप्रिल, २०२३

<u>प्रस्तावना :</u>

दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणा-या कर्मचा-यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये अंमलात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये ठरविण्यात आली आहे. राज्यातील मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक/उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये ठरविण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदेकडील शिक्षण विभागात शिक्षकांसाठी नवीन परिभाषित अंशदान

निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे. सदर योजना केंद्राच्या धर्तीवर राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णय अन्वये समाविष्ट केलेली आहे. त्याचप्रमाणे जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना लागू असलेली परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) केंद्राच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत (NPS) समाविष्ट करण्याची कार्यपद्धती संदर्भाधीन क्र. ७ येथील शासन निर्णय अन्वये विहीत केली आहे. परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीचे लाभ अनुज्ञेय ठरत नाहीत.

तदनंतर केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.११ येथील Central Civil Services (Implementation of National Pension System) Rules, २०२१ दिनांक ३०.०३.२०२१ अन्वये केंद्र शासनाच्या सेवेतील राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्यांना सेवेत कार्यरत असताना मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबास कुटुंब निवृत्तिवेतन अथवा रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यास रुग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय केले आहे. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.१२ येथील Central Civil Services (Payment of Gratuity under National Pension System) Rules, २०२१ दिनांक २३.०९.२०२१ अन्वये केंद्र शासनाच्या सेवेतील राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंर्तगत कर्मचाऱ्याचा सेवेत कार्यरत असताना मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला मृत्यू उपदान, रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यास सेवानिवृत्ती उपदान तसेच शासन सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान अनुज्ञेय केले आहे.

केंद्र शासनाच्या वरील निर्णयाच्या धर्तीवर राज्य शासनाच्या सेवेतील परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान व रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवा उपदान तसेच सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवा उपदान मंजूर करणेबाबतची कार्यपध्दती संदर्भाधीन क्र. १३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये विहीत केली आहे. सदर तरतूद राज्यातील जिल्हा परिषदा तसेच, मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक /उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेत्तर पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी लागू राहील. मात्र याबाबत स्वतंत्र आदेश संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही त्यांच्या स्तरावरुन करावी. या सूचनेस अनुसरुन राज्यातील जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक /उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या बाबतीत स्वतंत्र आदेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

दिनांक ०१.११.२००५ रोजी व त्यानंतर राज्यातील जिल्हा परिषदा तसेच, मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी जो परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य आहे अशा -

(अ) शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्याचा सेवेत असतांना मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान,

(ब) रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान लागू करण्यात येत आहे.

त्यानुसार सदर कुटुंब निवृत्तिवेतनधारकास व रुग्णता निवृत्तिवेतनधारकास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील तरतुदीप्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन / रुग्णता निवृत्तिवेतन लागू होईल.

(क) तसेच १००% अनुदानित शाळेतील सेवेतून निवृत्त होणाऱ्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान लागू करण्यात येत आहे.

वरील निर्णयानुसार प्रदान करण्यात येणाऱ्या सेवानिवृत्ती उपदान व मृत्यु उपदानाच्या प्रयोजनार्थ सद्य:स्थितीत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील तरतूदी लागू राहतील.

२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. अंनियो २०१८/प्र.क्र.१४४/टीएनटी-६, दि.२०/०८/२०१९ अन्वये लागू करण्यात आलेली सानुग्रह अनुदान योजना ही वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१३ येथील शासन निर्णयाच्या दिनांकापासून बंद करण्यात आली आहे. सानुग्रह अनुदानासाठी प्राप्त झालेले अर्ज विचारात घेण्यात येऊ नयेत. तसेच, प्रलंबित प्रकरणे बंद करण्यात यावीत.

३. दिनांक ०१.११.२००५ ते या निर्णयाच्या दिनांकापर्यंत मृत्यू पावलेल्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या कुटुंबास मृत्यू उपदान, कुटुंब निवृत्तिवेतनाची थकबाकी तसेच नियमित कुटुंब निवृत्तिवेतन मिळण्यासाठी सदर शासन निर्णयासोबतचा **नमुना-३** मधील विकल्प कार्यालय प्रमुखाकडे सादर करावा लागेल. त्यानुसार कुटुंब निवृत्तिवेतनधारकास त्याला मिळालेल्या सानुग्रह अनुदानाची रक्कम व परिभाषित निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची व्याज / लाभांशासह रक्कम समायोजित करण्याच्या अटीवर कुटुंब निवृत्तिवेतनाचा लाभ अनुज्ञेय होईल. सदर रक्कम समायोजित झाल्यानंतर कुटुंब निवृत्तिवेतनधारकास नियमितपणे कुटुंब निवृत्तिवेतन अनुज्ञेय राहील.

४. राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत सध्या कार्यरत असलेल्या व यापुढे सेवेत नियुक्त होणारा शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी यांचा सेवेत असताना मृत्यू झाल्यास किंवा रुग्णता सेवानिवृत्त झाल्यास, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा रुग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय करण्याबाबत **अथवा** राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत त्याची कायम निवृत्तिवेतन लेखा क्रमांक (PRAN) मध्ये जमा असलेली संचित रक्कम निवृत्तिवेतन निधी विनियमक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार अनुक्रमे कुटुंबास किंवा त्याला मिळण्याबाबतचा सोबतचा **नमुना-२** मध्ये विकल्प कार्यालय प्रमुखाकडे सादर करावा.

५. जे राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत सध्या कार्यरत असलेल्या व यापुढे सेवेत नियुक्त होणारा शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा रुग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय करण्याबाबतचा विकल्प सादर करतील, त्यांनी **नमुना-१** प्रमाणे कुटुंबाचा तपशील सादर करणे अनिवार्य आहे.

६. राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या सर्व शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांनी शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वरील परिच्छेद क्र. ४ प्रमाणे विकल्प देणे बंधनकारक राहील. तसेच यापुढे १००% अनुदानित शाळेतील सेवेत १००% अनुदानित पदावर नियुक्त होणाऱ्या शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांनी उपरोक्तप्रमाणे विकल्प शासन सेवेत १००% अनुदानित पदावर नियुक्त झाल्यावर ८ दिवसाच्या आत सादर करणे आवश्यक राहील.

७. या अनुषंगाने वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात येणारे आदेश व सुधारणा लागू राहतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१४१८३४४६५५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.06.14 18:39:45 +05'30'

**(तुषार महाजन)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) भारत सरकारचे संचालक, वित्त विभाग, आर्थिक कार्य विभाग, (ECB & PR Division), नवी दिल्ली,
२) मुख्य लेखा अधिकारी, बी ब्लॉक, दिल्ली प्रशासन विकास भवन, नवी दिल्ली.
३) नियंत्रक, लेखा, परराष्ट्र मंत्रालय, नवी दिल्ली
४) महालेखापाल (लेखापरीक्षा-१), महाराष्ट्र, मुंबई,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १). महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखापरीक्षा-२), महाराष्ट्र, नागपूर,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता- २), महाराष्ट्र, नागपूर,
८) मा. राज्यपालांचे सचिव,
९) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
१०) मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
११) सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१७) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य,
१८) प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई..

१९) प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
२०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२१) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई..
२२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२३) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२४) मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
२५) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
२६) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
२७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
२८) मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२९) सर्व विभागीय आयुक्त,
३०) सर्व जिल्हाधिकारी,
३१) सर्व जिल्हयातील निवडमंडळे
३२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
३४) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
३५) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
३६) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा. कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
३७) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण/पुणे/नाशिक / औरंगाबाद / अमरावती/नागपूर,
३८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी,
३९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
४०) सर्व उपकोषागार अधिकारी,
४१) कार्यकारी संचालक, निवृत्तिवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण, बी-१४ / ए, छत्रपती शिवाजी भवन, कुतुब संस्थागत क्षेत्र, कटवारिया सराय, नवी दिल्ली- ११००१६ ४१.
४२) कार्यकारी उपाध्यक्ष, मे. एन. एस. डी.एल. e-Governance Infrastructure Limited, १ ला मजला, टाईम्स टॉवर, कमला मिल कम्पाऊंड, सेनापती बापट मार्ग, लोअर परेल, मुंबई- ४०००१३
४३) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
४४) सर्व जिल्हयांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
४५) शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे..
४६) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४७) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई.
४८) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक,
४९) सर्व शिक्षणाधिकारी
५०) शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई, दक्षिण/ उत्तर पश्चिम,
५१) सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ,
५२) सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य.
५३) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण),
५४) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने.
५५) निवड नस्ती.
५६) अवर सचिव, वित्त विभाग, सेवा-४, मंत्रालय, मुंबई-३२.

## <u>नमुना १</u>

## कुटुंबाचा तपशील

शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्याचे नाव :

पदनाम :

जन्म तारीख :

नियुक्तीचा दिनांक :

............. रोजी माझ्या कुटुंबात असलेल्या सदस्यांचा तपशील

| अनुक्रमांक | कुटुंबातील सदस्याचे नाव | जन्मतारीख | कर्मचाऱ्याशी असलेले नाते | कार्यालय प्रमुखाची सही | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | | | | | |
| २ | | | | | |
| ३ | | | | | |
| ४ | | | | | |
| ५ | | | | | |
| ६ | | | | | |
| ७ | | | | | |
| ८ | | | | | |
| ९ | | | | | |

वरील तपशिलात कोणतीही भर पडल्यास किंवा फेरबदल झाल्यास त्यासंबंधीची माहिती कार्यालय प्रमुखास / लेखापरीक्षा अधिकाऱ्यास कळवून हा तपशील अद्यावत ठेवण्याची मी याद्वारे हमी घेतो.

ठिकाण:
दिनांक:

कर्मचाऱ्याची सही
DCPS/PRAN NO :-

*या प्रयोजनासाठी कुटुंब याचा अर्थ, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ यातील नियम ११६ (१६) (बी) यात व्याख्या केल्याप्रमाणे असलेले "कुटुंब" असा होतो.

**टीप** - पत्नी व पती यामध्ये अनुक्रमे **न्यायिक** फारकत घेतलेल्या पत्नीचा व पतीचा समावेश होतो.

**नमुना २**

## सेवेत असताना १००% अनुदानित पदावरील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी विकलांगतेमुळे शाळेतील सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यु पावल्यास त्याला अनुज्ञेय लाभ मिळण्याबाबत

**विकल्प "अ"**

मी............................ याद्वारे विकल्प देत आहे की, १००% अनुदानित शाळेतील १००% अनुदानित पदावर सेवेत असताना विकलांगतेमुळे शाळेतील सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यू पावल्यास मला / माझ्या कुटुंबास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ अनुसार लाभ देण्यात यावेत.

अथवा

**विकल्प "ब"**

मी.............................याद्वारे विकल्प देत आहे की, १००% अनुदानित शाळेतील १००% अनुदानित पदावर सेवेत असताना विकलांगतेमुळे शाळेतील सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यू पावल्यास मला / माझ्या कुटुंबास राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अनुसार लाभ देण्यात यावेत.

कर्मचाऱ्याची स्वाक्षरी
नाव
पदनाम
कार्यालयाचे नाव व पत्ता
DCPS/PRAN NO :-

ठिकाण :
दिनांक :

हा विकल्प दिल्यामुळे यापूर्वी दिलेला विकल्प रद्द समजण्यात यावा.
*** आवश्यक नसेल ते खोडावे,**

---

**कार्यालय प्रमुख यांनी भरावे.**

विकल्प प्राप्त झाल्याचा दिनांक ......................
कर्मचारी श्री/श्रीम..........................पदनाम ...................... हे १००% अनुदानित शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी असून त्यांचा DCPS/PRAN NO...................... असा आहे. त्यांनी विकल्प "अ" अथवा "ब" पैकी................. हा विकल्प स्विकारला आहे. याबाबतचा नोंद सेवापुस्तकामधील पृ.क्र. / प. वि. वर घेण्यात आली आहे.

कार्यालय प्रमुखाची सही व शिक्का

विकल्प स्विकारल्याची प्रत संबंधित कर्मचाऱ्यास देण्यात यावी.

**<u>नमुना ३</u>**

**परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचा-यांना दि. १.११.२००५ ते आजपर्यंतच्या कालावधीत रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांनी / मृत्यू झालेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांनी द्यावयाचा विकल्प**

मी, ............................. याद्वारे विकल्प देत आहे की, मला राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणालीतर्गत लाभ देण्यात यावे.

अथवा

मी, ............................... याद्वारे विकल्प देत आहे की, मला महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ अंतर्गत लाभ देण्यात यावे. सदर लाभ अनुज्ञेय करताना परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत देण्यात आलेले लाभ सानुग्रह अनुदानाची रक्कम व परिभाषित निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची व्याज / लाभांशासह रक्कम समायोजित करण्यात यावे.

रुग्णता निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याची स्वाक्षरी/
कुटुंब निवृत्तिवेतनधारकाची स्वाक्षरी